

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ९२) श्री भ्रमराम्बाष्टम्-१

चाञ्चल्यारुणलोचनाञ्चितकृपाचन्द्रार्कचूडामणिं
चारुस्मेरमुखां चराचरजगत्संरक्षणीं तत्पदाम्।
चञ्चच्चम्पकनासिकाग्रविलसन्मुक्तामणीरञ्जितां
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।१।।

श्री दुर्गा सप्तशती ग्रंथाच्या अकराव्या अध्यायात आई जगदंबेच्या विविध अवतारांचे वर्णन आले आहे. त्यात अरुण नावाच्या राक्षसाचा विनाशासाठी जगदंबेने घेतलेल्या भ्रमरांबा अवतारांचे वर्णन आहे.

त्याला मारण्यासाठी आईने आपल्या शरीरातून अनेक भ्रमर अर्थात भुंगे निर्माण केले. त्यामुळे तिला हे नाव पडले.

दक्षिण भारतात श्रीशैल पर्वतावर असणाऱ्या या स्वरूपाचे वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

चाञ्चल्यारुणलोचना- भिरभिरणार्या लाल डोळ्यांनी युक्त असणारी. डोळ्यांची हालचाल हे सौंदर्याचे प्रतीक आहे तर त्यांचा लाल रंग प्रेमाचे. चितकृपा- अशा नेत्राने कृपा करणारी.

चन्द्रार्कचूडामणिं- चंद्र आणि सूर्य यांना चुडामणी अर्थात मस्तकावर धारण करणारी. अर्थात तिच्या मस्तकावरील दागिने सूर्याप्रमाणे तेजस्वी आणि चंद्राप्रमाणे आल्हाददायक आहेत.

चारु- सौंदर्यपूर्ण

स्मेर- किंचित दात दिसणारे सुंदर हास्य.

मुखां- ज्यांनी युक्त मुख असणारी. चराचरजगत्संरक्षणीं- चर अर्थात हालचाल करणारे आणि अचर अर्थात स्थिर अशा सर्व जगाची संरक्षण कर्ती .

तत्पदाम्- तत्वमसि महावाक्यात तत् हे पद ईश्वरासाठी वापरले जाते. तशी ईश्वरी स्वरूप असलेली.

चञ्चल- लोलका प्रमाणे हलत असलेल्या,

चम्पकनासिका- चाफेकळी प्रमाणे असणारी नासिका.

अग्रविलसन्मुक्तामणी- त्यांच्या अग्रभागी शोभून दिसणाऱ्या मोत्याच्या मण्याने,

रञ्जितां- विलसत असलेली.

श्रीशैलस्थलवासिनीं- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या, भगवतीं श्रीमातरं- देवी श्री भ्रमराम्बेला भावये- मी ध्यातो. मी अखंड तिचे ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९३) श्री भ्रमराम्बाष्टकम् -२

कस्तूरीतिलकाञ्चितेन्दुविलसत्प्रोद्भासिफालस्थलीं
कर्पूरद्रवमिश्रचूर्णखदिरामोदोल्ल सद्वीटिकाम्।
लोलापाङ्गतरङ्गितैरधिकृपासारैर्नतानन्दिनीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।२।।

आई ललितांबेच्या मुख कमलाचे सौंदर्य वर्णन करताना पूज्यपाद जगद्गुरु शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

कस्तूरीतिलकाञ्चित- कस्तुरी मिश्रित तिलकाद्वारे विलोभनीय असणारे.

सोळा शृंगारात शेवटचा शृंगार आहे तिलक धारण. त्या तिलका मधील सर्वश्रेष्ठ तिलक कस्तुरीचा. त्याचे वर्णन, अर्थात परिपूर्ण शृंगार केलेली.

इन्दुविलसत्- इंदू म्हणजे चंद्राप्रमाणे, विलसत् म्हणजे सुंदर दिसणारे. मुखकमल.

प्रोद्भासि- चमकदार असणारी

फालस्थलीं- भांग पाडलेली जागा.

केसांमध्ये भांग पाडतांना जेथे ते दोन भागात विभागल्या जातात त्या स्थानाला फालस्थली म्हणतात.

कर्पूरद्रव म्हणजे कापूर.मिश्रचूर्ण त्याचे चूर्ण ज्या मध्ये मिसळले आहे असे.

विडा अर्थात पान तयार करताना त्यामध्ये भीमसेनी कापराचे चूर्ण घातले जाते. त्याचा येथे संदर्भ आहे.

खदिर- म्हणजे खैर. त्या झाडापासून काथ निर्माण करतात. येथे विड्याचा संबंध असल्याने खैर शब्दात काथ अपेक्षित आहे.

आमोदोल्लसद्- त्याचा सुगंध दरवळणारे,

विटिकाम्- पान, विडा.

आई जगदंबेच्या अत्यंत आवडत्या नैवेद्या मध्ये विडा सम्मिलित आहे.

यांनी आईचे मुख, लालबुंद, रसपूर्ण आणि सुगंधी झाले आहे.

लोलापाङ्ग- हलणाऱ्या डोळ्याच्या कडा,

तरङ्गितैः- त्यांचा तरंगांनी

अधिकृपासारैः- वर्षाव करीत असणाऱ्या कृपेच्या द्वारे.

नतानन्दिनीं - विनम्र असणाऱ्यांना आनंद देणारी. अर्थात भक्तांना परिपूर्ण आनंद प्रदान करणारी.

श्रीशैलस्थलवासिनीं- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या, भगवतीं श्रीमातरं- देवी श्री भ्रमराम्बेला भावये- मी ध्यातो. मी अखंड तिचे ध्यान करतो



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१४) श्री भ्रमराम्बाष्टकम्-३

राजन्मत्तमरालमन्दगमनां राजीवपत्रेक्षणां
राजीवप्रभवादिदेवमकुटै राजत्पदाम्भोरुहाम्।
राजीवायतमन्दमण्डितकुचां राजाधिराजेश्वरीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।३।।

राजन्- शोभासंपन्न असलेली,

मत्तमराल- आपल्याच आनंदात डौलत जाणारा मराल म्हणजे हंस.

मन्दगमनां - त्याप्रमाणे मंद गतीने गमन करीत असलेली.

राजीवपत्रेक्षणां- राजीव म्हणजे कमळ. त्याचे पत्र अर्थात पाकळी प्रमाणे, ईक्षणा म्हणजे दृष्टी अर्थात डोळे असणारी.

राजीवप्रभवादि- राजीव अर्थात कमळातून ,प्रभव अर्थात उत्पन्न झालेले. म्हणजे भगवान ब्रह्मदेव.

भगवान श्रीविष्णूंच्या नाभीतून निघालेल्या कमळातून भगवान ब्रह्मदेव प्रगटले आहेत. त्यामुळे ज्यांना राजीवप्रभव असे म्हटले आहे.

ते ज्यांच्या अग्रभागी आहेत असा सर्व देवांचा समुदाय म्हणजे राजीवप्रभवादि.

देवमकुटै- अशा सर्व देवांच्या मुकुटांनी राजत्पदाम्भोरुहाम्- पद म्हणजे पाय, अंभोरूह म्हणजे कमळ. राजत् म्हणजे शोभून दिसणारी.

अशा सर्व देवांच्या मुकुटांनी जिचे चरणकमल शोभून दिसत आहेत अशी. या सर्व देवता चरणावर मस्तक ठेवत असल्याने, आईचे पाय दिसतच नाही तर या देवांचे मुकुटच दिसतात अशी सुंदर कल्पना आचार्यश्री करीत आहेत.

राजीवायतमन्दमण्डितकुचां- राजीव म्हणजे कमळ, आयत म्हणजे फुललेले, मंद म्हणजे हळुवार हलणारे, मंडितकुचा अर्थात वक्षस्थल शोभून दिसणारी.

आई जगदंबेने गळ्यात फुललेल्या कमळाची माळ घातली आहे. आईच्या मंद श्वासाने आणि हृदयाच्या हळुवार हालचालीने, ती माळ मंद हलत आहे. तिने शोभून दिसणारी.

राजाधिराजेश्वरीं- सर्व राजांचीही महाराणी असणारी.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबा ,श्री भ्रमराम्बेचे मी भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९५) श्री भ्रमराम्बाष्टकम्-४

षट्तारां गणदीपिकां शिवसतीं षड्वैरिवर्गापहां
षट्चक्रान्तरसंस्थितां वरसुधां षड्योगिनीवेष्टिताम्।
षट्चक्राञ्चितपादुकाञ्चितपदां षड्भावगां षोडशीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।४।।

षट्तारां - हा शब्द समजून घेण्यासाठी थोडी कसरत करणे आवश्यक आहे.

षट्तारा म्हणजे सहा ताऱ्यांचा समुदाय. असा समुदायास असतो कृतिका नक्षत्राचा. त्या सहा कृतिका देवसेनापती कार्तिकेयाच्या माता. श्री कार्तिकेय म्हणजे स्कंद हे देवी पार्वतीचे पुत्र. ती देवी पार्वतीच सर्व रूपात नटली असल्याने, कृत्तिका रूपातील सहा ताऱ्यांच्या रूपात नटलेली ती षट्तारा.

या सहापैकी सगळ्यात मोठ्या ताऱ्याचे नाव अंबा आहे हे विशेष.

गणदीपिकां- विश्वातील सर्व जीव हेच जणू जगदंबेचे गण आहेत. त्यांना चैतन्य प्रदान करणारी.

शिवसतीं- भगवान शंकरांची प्रियतमा. षड्वैरिवर्गापहां- काम, क्रोध,लोभ,मोह,मद आणि मत्सर यांना षड्वैरी म्हणतात. त्यांच्या वर्ग म्हणजे समुदायाला, अपहा म्हणजे दूर करणारी.

षट्चक्रान्तरसंस्थितां- मूलतः सहस्त्रारचक्रात निवास करणारी आदिशक्ती, शरीरातील मूलाधारा पासून आज्ञाचक्रा पर्यंत सहा चक्रांच्या ठिकाणी निवास करते.

वरसुधां- श्रेष्ठ अमृत स्वरूपिणी.

षड्योगिनीवेष्टिताम्- सेवा करण्यासाठी सहा योगिनींनी वेढलेली.

षट्चक्राञ्चितपादुकाञ्चितपदां- नाभी कमलस्थित कुंडलिनी शक्ती सहा चक्रांवर आपली पावले उमटवत शेवटी सहस्त्रार चक्रात स्थिर होते. त्या चक्रांना पार करत जाण्याला, त्याद्वारे चरण सुशोभित असणाऱ्या जगदंबेला षट्चक्राञ्चितपादुकाञ्चितपदा म्हणतात.

षड्भावगां - शास्त्रात वर्णिलेल्या अस्ति, भाति इ. सहा भाव अर्थात अवस्थांची अधिष्ठात्री.

षोडशीं- कायम सोळा वर्षांच्या युवती प्रमाणे सौंदर्यवती.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबेचे मी भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९६) श्री भ्रमराम्बाष्टकम् -५

श्रीनाथादृतपालितत्रिभुवनां श्रीचक्रसंचारिणीं ।
दीनानामतिवेलभाग्यजननीं दिव्याम्बरालंकृतां
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।५।।

श्रीनाथादृत- श्री म्हणजे देवी लक्ष्मी.तिचे नाथ म्हणजे भगवान विष्णू. त्यांच्याद्वारे आदृत म्हणजे आदर व्यक्त केला आहे अशी.

पालितत्रिभुवनां- स्वर्ग, मृत्यु ,पाताळ अशा तीनही भुवनांची पालन कर्ती. श्रीचक्रसंचारिणीं- शाक्त उपासनेत श्री यंत्राला अनन्यसाधारण महत्त्व आहे.त्या यंत्रात विद्यमान समस्त देवतांच्या ठिकाणी विद्यमान चैतन्यशक्ती.

यानंतरचे विशेषण शांतपणे समजून घ्यावे लागेल.

ज्ञानासक्त- ज्ञान मिळवण्याची इच्छा असलेल्या,

मनोज- कामदेव व त्यांच्या शक्ती,

यौवनलसद्- यौवनाने मुसमुसलेल्या.

गन्धर्वकन्यादृताम्- गंधर्वकन्यांनी आदर दिलेली.

गंधर्वकन्या या मदन गुणांनी आणि यौवनाने परिपूर्ण आहेत. मात्र त्यांना अपेक्षा ज्ञानाची आहे. यातच आचार्य सांगताहेत की त्यांना माहिती आहे हे यौवनादिक टिकणारे नाहीत. शाश्वत सुखाचा आधार नाहीत. जर गंधर्वकन्यांचे सौंदर्य शाश्वत नसेल तर आपले कसे असेल? शाश्वत आहे केवळ ज्ञान. आई जगदंबा त्या ज्ञानाला प्रदान करते. त्यामुळे गंधर्वकन्या तिला आदर देत आहेत. तिची सेवा करीत आहेत.

दीनानाम् - हीन,दीन भक्तांचे,

अतिवेलभाग्य- अत्यंत श्रेष्ठ सौभाग्य,

जननीं- निर्माण करणारी.

अर्थात त्यांना श्रेष्ठ भाग्य प्रदान करणारी.

दिव्याम्बरालंकृतां- दिव्य वस्त्र धारण केलेल्या,

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबेचे मी ध्यान करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९७) श्री भ्रमराम्बाष्टकम्-६

लावण्याधिकभूषिताङ्गलतिकां लाक्षालसद्रागिणीं
सेवायातसमस्तदेववनितां सीमन्तभूषांन्विताम्।
भावोल्लासवशीकृतप्रियतमां भण्डासुरच्छेदिनीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।६।।

लावण्याधिकभूषिताङ्गलतिकां- लावण्या मुळे जिची अंगलतिका अधिकच सुशोभित झाली आहे अशी.

सौंदर्य म्हणजे अवयवांचे प्रमाणबद्ध स्वरूप. त्याने व्यक्ती सुंदर दिसते. मात्र ही प्रमाणबद्धता लहान लेकरा पासून वृद्धा पर्यंत असू शकते. तारुण्याच्या काळात त्यात येणारे विशेष आकर्षण म्हणजे लावण्य. आधीच अत्यंत सुंदर असणारी आईची अंगयष्टी या तारुण्यागत लावण्याने अधिकच सुंदर दिसत आहे.

लाक्षालसद्रागिणीं- हाताला आणि पायाला लावण्याचा लाल रंगाचा अळिता म्हणजे लाक्षारस. त्याने अधिकच शोभून दिसणारी.

सेवायातसमस्तदेववनितां- समस्त देवतांच्या वनिता म्हणजे स्त्रिया, जिच्या सेवेकरिता आलेल्या आहेत अशी. सीमन्तभूषांन्विताम्- सीमा म्हणजे भांग. त्यात सौभाग्याचे प्रतीक म्हणून शेंदूर लावल्याने अधिक सुंदर दिसणारी. परम सौभाग्यसंपन्न.

भावोल्लासवशीकृतप्रियतमां- भाव अर्थात आपल्या हावभावाने, उल्हासाने, आपल्या प्रियतम भगवंताला वशीभूत करणारी. भण्डासुरच्छेदिनीं- पुराणामध्ये आलेल्या कथेनुसार भगवान कामदेवांच्या भस्मातून भंडासूर नामक राक्षस निर्माण झाला. भगवान शंकरांच्या वरदानाने उन्मत्त झालेल्या राक्षसाचा विनाश आई जगदंबे केला. त्यामुळे तिला भण्डासुरच्छेदिनीं असे म्हणतात.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई भ्रमरांबेचे मी भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९८) श्री भ्रमराम्बाष्टकम्-७

धन्यां सोमविभावनीयचरितां धाराधरश्यामलां
मुन्याराधनमेधिनीं सुमवतां मुक्तिप्रदानव्रताम्।
कन्यापूजनसुप्रसन्नहृदयां काञ्चीलसन्मध्यमां
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये।।७।।

धन्यां - धन्य असलेली. धन्यता ही जीवनातील अशी एक सुंदर अवस्था आहे की जेथे काहीही मिळवायचे बाकी नसते. कृतार्थ. सार्थक. आई जगदंबा तशी आहे. सोमविभावनीयचरितां- सोम म्हणजे चंद्र. विभावनीय अर्थात सुंदर. चरित अर्थात चारित्र्य. आचरण.

आई जगदंबेची प्रत्येक लीला चंद्राप्रमाणे शुभ्र, प्रसन्न ,आल्हाददायक आहे.

धाराधरश्यामलां- धारा म्हणजे पर्जन्यवृष्टी. त्यात धारांना धरणारा तो धाराधर म्हणजे मेघ. त्याप्रमाणे सावळ्या वर्णाची असलेली.

भारतीय संस्कृतीत मेघ:शाम हा सौंदर्याचा रंग वर्णिला आहे.

मुन्याराधनमेधिनीं- मुनी म्हणजे ऋषिमुनी. त्यांचे आराधना म्हणजे साधना. तर मेधिनी म्हणजे भूमी.

अर्थात ऋषीमुनींच्या उपासनेचे आधारस्थान.

सुमवतां- सुम म्हणजे पुष्प. विविध फुलांनी अलंकृत असलेली. मुक्तिप्रदानव्रताम्- साधकांना मुक्ती प्रदान करणे हे जिचे व्रत अर्थात अत्यंत आवडते कार्य आहे अशी.

कन्यापूजनसुप्रसन्नहृदयां- कन्यांचे पूजन केल्यामुळे जिचे मन अत्यंत प्रसन्न होते अशी. काञ्चीलसन्मध्यमां- कांची म्हणजे मेखला, कंबरपट्टा. त्याने मध्यमा म्हणजे कंबर शोभून दिसणारी.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये- श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबा भ्रमरांबेचे मी भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९९) श्री भ्रमरांबाष्टकम्-८

कर्पूरागरुकुङ्कुमाङ्कितकुचां कर्पूरवर्णस्थितां
कृष्टोत्कृष्टसुकृष्ट कर्मदहनां कामेश्वरीं कामिनीम् ।
कामाक्षीं करुणारसार्द्रहृदयां कल्पान्तरस्थायिनीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये ।। ८।।

कर्पूर- कापूर

आगरु- काळे चंदन

कुङ्कुम- कुंकू

अङ्कितकुचां- यांनी वक्षस्थल व्याप्त असलेली. या सगळ्यांची उटी आई जगदंबेने शरीराला लावली आहे. कर्पूरवर्णस्थितां- कापरा प्रमाणे शुभ्र पांढऱ्या रंगाची.

कृष्टोत्कृष्ट- कृष्ट म्हणजे निम्न तर उत्कृष्ट म्हणजे अप्रतिम.

सुकृष्ट- सुयोग्यरीत्या केलेले,

कर्मदहनां - कर्माला जाळून टाकणारी.

कर्माची रचना एखाद्या बीजाप्रमाणे असते. बीज ज्या प्रकारचे असते वृक्ष त्या प्रकारचा निर्माण होतो. तसे कर्म जसे असते तसे फळ प्राप्त होते. मात्र जर हे बी भाजले आणि नंतर पेरले तर ते उगवत नाही. त्याप्रमाणे एकदा आई जगदंबेची कृपा प्राप्त झाली की मग कोणत्याही कर्माचे फळ अर्थात बंध लागत नाहीत.

कामेश्वरीं - सर्व कामना अर्थात इच्छांची अधिष्ठात्री.

कामिनीम् - भक्तांच्या, साधकांच्या सकल कामना पूर्ण करणारी.

कामाक्षीं- काम म्हणजे इच्छा. अक्षी म्हणजे निवास. सकल कामनांचे निवास अर्थात मूळ स्थान. करुणारसार्द्रहृदयां- कारुण्य रसाने जिचे हृदय भरलेले आहे अशी. कल्पान्तरस्थायिनीं-

भगवान श्री ब्रह्मदेवांच्या दिवसाच्या शेवटी या संपूर्ण विश्वाचा जो लय होतो तो पर्यंतच्या काळाला कल्प म्हणतात. त्यावेळी सर्वकाही नष्ट होते. मात्र त्यावेळी सुद्धा नष्ट होणारी आदिशक्ती कल्पान्तरस्थायिनी संबोधिली जाते.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये - श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबेचे मी  भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१००) श्री भ्रमरांबाष्टकम् -९

गायत्रीं गरुडध्वजां गगनगां गान्धर्वगानप्रियां
गम्भीरां गजगामिनीं गिरिसुतां गन्धाक्षतालंकृताम् ।
गङ्गागौतमगर्गसंनुतपदां गां गौतमीं गोमतीं
श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये ।। ९।।

एकच अक्षर किंवा शब्द वारंवार वापरण्याला साहित्यात अनुप्रास अलंकार असे म्हणतात. मागील श्लोकात आचार्यश्रींनी क चा उपयोग करून तर या श्लोकात ग चा उपयोग करून अनुप्रास साधला आहे.

गायत्रीं - ज्याचे गायन केल्याने साधक तरुन जातो, त्या मंत्राला गायत्री म्हणतात. सर्वच मंत्रांचे गायन अर्थात आनंद पूर्ण उच्चारण करावे.

गरुडध्वजा- गरुडध्वज म्हणजे भगवान विष्णू. त्यांची सहधर्मचारिणी.

गगनगा- गगन म्हणजे आकाश. त्यातून ग म्हणजे गमन करणारा अर्थात भगवान सूर्य. तशी तेजस्वी. त्याच्या प्रकाशाच्या मागे असणारी चैतन्यशक्ती. ज्ञानशक्ती.

गान्धर्वगानप्रिया- देवतांचे जे विविध प्रकार आहेत, त्यापैकी गायन प्रवीण असणाऱ्या देवतांना गंधर्व असे म्हणतात. हाहा, हूहू, तुंबरू अशा अनेक गंधर्वांचे वर्णन शास्त्रात आहे. त्या गंधर्वांच्या द्वारे केल्या जाणारे गायन अत्यंत प्रिय असणारी.

गम्भीरा- अत्यंत गहन. सहजा सहजी पार न लागणारी. अपार. अथांग. अनाकलनीय.

गजगामिनी- हत्तीप्रमाणे शांत, गंभीर तथा आकर्षक गतीने चालत जाणारी.

गिरिसुतां- गिरी म्हणजे पर्वत. त्यांचा राजा तो हिमालय. त्याची कन्या. पार्वती. गन्धाक्षतालंकृताम् - मस्तकावर गंध आणि त्यावर अक्षता धारण केलेली.

गङ्गा- गंगा म्हणजेच गमनशीला . गमन अर्थात गती हा चैतन्याचा विषय. त्यामुळे गंगा म्हणजे चैतन्यमयी.

गौतमगर्गसंनुतपदां - गौतम, गर्ग इ. ऋषिमुनींनी चरण वंदना केलेली.

गां- गोमाता स्वरूप असलेली.

गौतमीं - महर्षी गौतमांवर आलेले गोहत्येचे बालंट दूर करण्यासाठी त्यांनी तपश्चर्या केल्यामुळे प्रगटलेली गोदावरी स्वरूप असलेली.

गोमतीं- दक्षिण भारतात गोमती नदी स्वरूप असलेली.

श्रीशैलस्थलवासिनीं भगवतीं श्रीमातरं भावये - श्रीशैल पर्वतावर निवास करणाऱ्या आई जगदंबा भ्रमराम्बेचे मी भजन करतो.

जय भ्रमराम्बा !